**राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या अहवाल क्र.५६ मधील शिफारशींनुसार महाराष्ट्र राज्यातील भटक्या जमातीच्या यादींमध्ये नव्याने जाती समाविष्ट करणे, दुरुस्ती करणे व वगळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आयोग-२०२४/प्र.क्र.६०/मावक**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :** १) शासन निर्णय क्र.सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.२३५/मावक-५, दि.२५.०६.२००८
२) शासन निर्णय क्र.सीबीसी-२०१९/प्र.क्र.७२/मावक, दि.०४.०६.२०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याच्या इतर मागास वर्ग, विमुक्त जाती / भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील जातीच्या यादीमध्ये राज्य मागासवर्ग आयोगाच्या अहवालानुसार वाचा येथे नमूद क्र.१ व २ च्या शासन निर्णयांन्वये काही नवीन जातींचा अंतर्भाव करुन / वगळून यादी अद्ययावत केलेली आहे.

राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांनी अहवाल क्र. ५६ शासनास सादर करुन त्याद्वारे “ठेलारी" ही जात महाराष्ट्र शासनाच्या 'भटक्या जमाती (ब)' यादीतील अ.क्र. २७ येथून वगळून 'भटक्या जमाती (क)' यादीतील अ.क्र.२९ मध्ये धनगर या जातीची तत्सम जात म्हणून समावेश करण्याबाबत शिफारस केली आहे. त्यानुषंगाने मा.मंत्रीमंडळाने सदर शिफारस मान्य केली असून सदर मान्यता विचारात घेता, महाराष्ट्र राज्याच्या भटक्या जमातीच्या यादीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या अहवाल क्र. ५६ मधील शिफारशीनुसार विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या दि २५.०६.२००८ व दि.०४.०६.२०१९ रोजीच्या शासन निर्णयांन्यये अंतिम करण्यात आलेल्या जाती / तत्सम जातीच्या यादीत खालील प्रमाणे बदल करण्यास याद्वारे शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने अहवाल क्र. ५६ मध्ये प्र.क्र.०३/२०१७ अन्वये “ठेलारी" जातीचा 'भटक्या जमाती (क)' प्रवर्गात समावेश करण्याबाबत सखोल पडताळणीअंती शासनास अभिप्राय सादर केले आहेत. सदर प्रकरणांबाबतची वस्तुस्थिती व गुणवत्ता विचारात घेऊन खालील तक्त्यात नमूदप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | आयोगाचा प्र.क्र. | जातीचे नाव | शासनाचा निर्णय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | प्र.क्र.०३/२०१७ | ठेलारी | आयोगाच्या शिफारशीनुसार “ठेलारी" ही जात महाराष्ट्र शासनाच्या 'भटक्या जमाती (ब)' यादीतील अ.क्र. २७ येथून वगळून **'भटक्या जमाती (क)'** यादीतील अ.क्र.२९ मध्ये धनगर या जातीची तत्सम जात म्हणून समावेश करण्यात येत आहे. |

**०३.** सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेले बदल हे शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

**०४.** सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२४०८०६१२४१५१८९३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA RAMDAS PETKAR

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=02221e63deda18472966f6ceba0e52b81716756b206278e1f5bd437fe438c944, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=93D05A1F2A6CEAD3ED9E358A4D06E909B2A25FE9A918A443E6204CD5D72B0ED9, cn=RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2024.08.06 13:00:05 +05'30'

**( र. रा. पेटकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खासगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, विभानसभा यांचे खासगी सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव व प्रधान सचिव.
५. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,
६. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,
७. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/ विधान परिषद यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सर्व मा. पालकमंत्री तथा मंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे सह/उप सचिव.
११. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग. त्यांना विनती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख सूचना दयाव्यात.
१३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१. मुंबई.
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. मुख्य महानगर दंडाधिकारी
१८. सर्वे विभागीय आयुका,
१९. सर्व जिल्हा दंडाधिकारी,
२०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२१. सर्व उप विभागीय अधिकारी (महसूल) तथा उप विभागीय दंडाधिकारी,
२२. सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी तथा तहसिलदार,
२३. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई
२४. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, गुबई
२५. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा खंडपीठ, नागपूर
२६. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा खंडपीठ, नागपूर
२७. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा खंडपीठ, औरंगाबाद
२८. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा खंडपीठ, औरंगाबाद

२९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे
३०. संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३१. संचालक, माध्यमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३२. संचालक, प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३३. संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक
३४. संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
३५. सदस्य सचिव, राज्य मागासवर्ग आयोग, पुणे
३६. उपायुक्त तथा सदस्य, विभागीय जात पडताळणी समिती (सर्व जिल्हे)
३७. सदस्य सचिव, जिल्हास्तरीय जात पडताळणी समिती (सर्व जिल्हे)
३८. सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
३९. सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी/ सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी
४०. सर्व सहायक सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
४१. सर्व जिल्हा परिषदांचे समाजकल्याण अधिकारी
४२. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, बृहन्मुंबई/ मुंबई उपनगरे
४३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
४४. निवड नस्ती.